कळमनुरी, जिल्हा-हिंगोली येथील अल्पसंख्याक मुलींच्या वसतिगृह इमारत नूतनीकरणासाठी येणा-या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: वसगृ- २०२४ /प्र.क्र.५६/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
**दिनांक: २० मार्च, २०२५**

वाचा :-

१) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: अविवि-२००९/प्र.क्र.१५/का.८, दि.०२ मार्च, २०१०,
२) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: वसगृ-२०११/प्र.क्र.१३०/का.८, दि.२० डिसेंबर, २०११,
३) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: वसगृ २०१२/प्र.क्र.३१/का.८, दि.२६ मार्च,२०१२
४) वित्त विभाग शासन निर्णय क्र. विप्रअ-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.२० सप्टेंबर, २०१९
५) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५ सप्टेंबर, २०१९
६) जिल्हाधिकारी हिंगोली यांचे पत्र क्र. जिनिसहिं/अल्प. सं. वसतिगृह/अ.भ./२०२४-२५/२५३०, दि.१०.१२.२०२४

प्रस्तावना :-

अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थिनींसाठी राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये वसतीगृहे बांधण्याबाबत तसेच विद्यापीठाच्या आवारात वसतीगृहे बांधण्याबाबत संदर्भ क्र.(१) व (२) येथील शासन निर्णयांन्वये निर्णय घेण्यात आला आहे. हिंगोली जिल्हयातील कळमनुरी येथे अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थीनींकरिता १०० प्रवेश क्षमतेचे वसतीगृह बांधण्यास संदर्भ क्र.३,दि.२६.०३.२०१२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येऊन वसतीगृहाचे बांधकाम करुन वसतिगृह कार्यन्वित करण्यात आले आहे. संदर्भ क्र. ६ येथील पत्रान्वये सदर वसतीगृहाच्या नुतनीकरणाचा प्रस्ताव जिल्हाधिकारी, हिंगोली यांनी सादर केला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने कळमनुरी, जिल्हा-हिंगोली येथील अल्पसंख्याक मुलींच्या वसतिगृहाच्या नुतनीकरणाच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

कळमनुरी, जिल्हा-हिंगोली येथील अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनींच्या वसतिगृह नुतनीकरणाच्या कामांसाठी जिल्हाधिकारी, हिंगोली यांनी सादर केलेल्या रु.९९,६९,०००/- (अक्षरी रुपये नव्व्याणव लाख एकोणसत्तर हजार फक्त ) इतक्या

रकमेच्या अंदाजपत्रकास याव्दारे पुढील अटींच्या अधिनतेने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१. वसतीगृहाच्या नुतनीकरणाची कामे सार्वजनिक बांधकाम विभाग यांचेमार्फत करुन घ्यावित.
२. निधी उपलब्ध झाल्याशिवाय प्रत्यक्ष कामांना सुरुवात करु नये.
३. वसतीगृहाच्या नुतनीकरणाचा त्रैमासिक प्रगती अहवाल जिल्हाधिकारी, हिंगोली यांनी शासनास सादर करावा.
४. सदर कामाबाबतची निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर शासनास कळवावे. तसेच सदर इमारतीच्या नुतनीकरणाची कामे दि. ३१ डिसेंबर, २०२५ पर्यत पूर्ण करण्यात यावीत.
५. विषयांकीत कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, या दृष्टीने दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. वसतीगृहाच्या नुतनीकरणाच्या कामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे :-

| **Sr. No.** | **Description** | **Amount (in Rupees)** |
|---|---|---|
| 1 | Cost of Work Civil Work | 27,88,731 |
| 2 | Cost of Plumbing work | 4,74,630 |
| 3 | Cost of Furniture | 37,80,680 |
| 4 | Cost of Electrical Work ( Lumsum) | 9,00,000 |
| | **Total** | 79,44,041 |
| 5 | Add GST 18 % | 14,29,927 |
| 6 | Add 4 % Contingencies charges | 3,17,762 |
| 7 | Add 2 % Computerization charges | 1,58,881 |
| 8 | Add 1.00% Labour insurance | 79,440 |
| | **Total** | 99,30,051 |
| 9 | **Add for Royalty Charges** | 33,134 |
| 10 | **Testing Charges** | 6,110 |
| | **Total Amount** | 99,69,295 |
| | **पूर्णांकात** | 99,69,000 |
| | (अक्षरी रुपये नव्याण्णव लाख एकोणसत्तर हजार फक्त ) | |

**३.** यावर होणारा खर्च “मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसंख्यांक समाजातील वसतीगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२), ३१ सहायक अनुदान ( वेतनेतर )” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा.

**४.** निधी वितरणाबाबतचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील.

**५.** हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग- पहिला, उप विभाग- पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदाखालील प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमधील परिच्छेद क्र. १३४(१), १३४(२) आणि १३४ (३) खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.२५ सप्टेंबर, २०१९ च्या शासन परिपत्रकातील तरतूदीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०२५०३२०१८०८०३३११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by MILIND PADMANABH SHENOY
Date: 2025.03.20 18:11:57 +05'30'

**( मिलिंद शेणॉय )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई / नागपूर
२. महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व परीक्षा), मुंबई / नागपूर
३. प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. जिल्हाधिकारी, हिंगोली
६. जिल्हा नियोजन अधिकारी तथा जिल्हा अल्पसंख्याक अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, हिंगोली
७. संचालक, व्यवसाय शिक्षण प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य , मुंबई
८. उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, कळमनुरी, जि. हिंगोली
९. कार्यकारी, अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, हिंगोली
१०.सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मुंबई
११.जिल्हा कोषागार अधिकारी, हिंगोली
१२.वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४, व्यय-१) मंत्रालय, मुंबई
१३.नियोजन विभाग (कार्या.१४७१)
१४.कक्ष अधिकारी (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.निवड नस्ती, कार्यासन-८